आदिवासी विकास विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविल्या जाणाऱ्या अनुदानित व शासकीय प्राथमिक आश्रमशाळेतील बी.एड. शिक्षकांना प्रशिक्षित समजण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांक : याचिका-२०१६/प्र.क्र.२५१/का-११**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ जुलै, २०१८.

**वाचा :-**

१) शिक्षण रोजगार व युवक सेवा विभाग क्र.पीटीपी-१०७७/१४६९३/(१५०२) सात, दिनांक १४ नोव्हेंबर, १९७९.

२) शासन पत्र, शिक्षण व सेवायोजन विभाग क्र.पीआरई-१०८३/६४९१२ (५७०२)/प्राशि-१, दिनांक २३ सप्टेंबर, १९८३.

३) शासन परिपत्रक क्र.पीआरई-२०००/(२५८७)/प्राशि-१, दिनांक २५ ऑक्टोबर, २०००.

४) शासन निर्णय, शा.शि.वि. क्र.पीआरई-२०००/(२५८७)/प्राशि-१, दिनांक १२ नोव्हेंबर, २००१.

५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग. क्र.पीआरई-२००६/४९९१/२००६/प्राशि-१, दिनांक ११ नोव्हेंबर, २०११.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र एम्प्लॉइज ऑफ प्रायव्हेट स्कूल्स (कंडिशन ऑफ सर्व्हीसेस), रुल्स १९८१ मधील अनुसूची ब-(एक) मध्ये प्राथमिक शिक्षकांच्या अर्हता नमूद केलेल्या आहेत. त्यानुसार एस.एस.सी. आणि शिक्षण पदविका परीक्षा किंवा दोन वर्षाच्या कालावधीची शिक्षण पदविका (डी.एड.) उत्तीर्ण असणे आवश्यक आहे. त्यामुळे प्राथमिक शाळेतील शिक्षक पदवीधर बी.एड. असला तरी त्यास अप्रशिक्षित शिक्षक समजण्यात येत होते. तथापि, संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये स्थानिक स्वराज्य संस्थेच्या प्राथमिक शाळांना जोडलेल्या इयत्ता ५ वी ते ७ वी च्या वर्गांना शिक्षक मंजुरीच्या निकषानुसार जेथे ४ किंवा त्यापेक्षा अधिक शिक्षक पदे मान्य होतात तेथे देय पदांपैकी २५% पदे पदवीधर प्रशिक्षित शिक्षकांच्या वेतनश्रेणीमध्ये परिवर्तीत करण्याची प्रक्रीया उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे.

२. तसेच संदर्भाधीन पत्र क्र.२ च्या पत्रान्वये दि.२३ सप्टेंबर, १९८३ पर्यंत सेवेत असलेले बी.ए.बी.एड. अर्हता असलेले खाजगी प्राथमिक शाळेमध्ये नियुक्त करण्यात आलेले बी.ए.बी.एड. शिक्षक प्रशिक्षित समजण्यात आलेले आहेत.

३. संदर्भाधीन क्र. ३ व ४ च्या आदेशान्वये राज्यातील प्राथमिक शिक्षकांमध्ये दि. ५ मे, २००० पूर्वी नियुक्त करण्यात आलेले सर्व बी.एड. अर्हता धारक शिक्षकांना अप्रशिक्षित समजून त्यांना पत्राद्वारे प्रशिक्षणासाठी पात्र समजण्यात आलेले आहे.

४. प्राथमिक आश्रमशाळांना जोडलेल्या इ. ५ वी ते ७ वी या वर्गांना देय होणाऱ्या पदवीधर प्रशिक्षित शिक्षकांच्या पदांसंदर्भात मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.४६३२/१९९९ व दि. ६ मे २००४ रोजी पारीत केलेला निर्णय व मा.सर्वोच्च न्यायालयाने विशेष अनुमती याचिका क्र.१५३११-१५३३१/२००५ मध्ये दि.२० फेब्रुवारी, २००७ रोजी दिलेले आदेश तसेच रिट याचिका क्र.३५०४/२०१४ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.३ फेब्रुवारी, २०१५ रोजी दिलेले आदेश व संदर्भाधीन क्र.५ वरील शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे आदेश विचारात घेऊन आदिवासी अनुदानित व शासकीय प्राथमिक आश्रमशाळांना जोडलेल्या इ. १ ली ते इ. ७ वी या वर्गांना देय होणाऱ्या प्रशिक्षित पदविधर शिक्षकांच्या नियुक्त्या व आदिवासी अनुदानित व शासकीय प्राथमिक आश्रमशाळेतील पदवीधर बी.एड. शिक्षकांना प्रशिक्षित म्हणून समजण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील मान्यताप्राप्त आदिवासी अनुदानित व शासकीय प्राथमिक आश्रमशाळांमधील इयत्ता १ ली ते इयत्ता ७ वी या वर्गांना प्रशिक्षित पदवीधर बी.एड. शिक्षकांची नेमणूक केली असल्यास खालील पध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

अ) आदिवासी अनुदानित व शासकीय प्राथमिक आश्रमशाळेतील पदवीधर शिक्षकांच्या (२५ %) पदावर बी.ए. / बी.एस.सी. व बी.एड. अगोदर अर्हता धारण करुन (डी.एड. ही अर्हता नसणारे) या पदावर शिक्षकांच्या नियुक्त्या केल्या असल्यास अशा शिक्षकांना नियुक्तीच्या दिनांकापासून प्रशिक्षित शिक्षक म्हणून समजण्यात यावे. त्यांना पदवीधर प्रशिक्षितांची (बी.एड.) वेतनश्रेणी देण्यात यावी.

ब) आदिवासी अनुदानित व शासकीय प्राथमिक आश्रमशाळेत या प्रशिक्षित (बी.एड.) पदवीधर शिक्षकांसाठी अनुज्ञेय असलेल्या २५ % पदांव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्राथमिक शिक्षकांच्या पदावर (डी.एड. अर्हता धारण न करणारे) पदवीधर व बी.एड. शिक्षकांच्याही नियुक्त्या केल्या असल्यास अशा शिक्षकांना त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून प्रशिक्षित शिक्षक समजण्यात यावे. अशा शिक्षकांना त्यांच्या नियुक्तीच्या वेळी देय असलेली डी.एड. प्रशिक्षित शिक्षकाची वेतनश्रेणी (आता वेतनबँड रु.५२००-२०२०० + ग्रेड पे रु.२८००) देय राहील. जर शिक्षण सेवक म्हणून सेवेत असल्यास त्यांना शिक्षण सेवकांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण केल्यानंतरच ही वेतनश्रेणी लागू करण्यात यावी.

क) आदिवासी अनुदानित व शासकीय प्राथमिक आश्रमशाळेतील इयत्ता ५ वी ते ७ वी वर्गाच्या पदवीधर शिक्षकांच्या (२५ %) पदावर नियुक्त असलेल्या केवळ डी.एड. अर्हता धारण करीत असलेल्या व नंतर बी.एड. ही अर्हता धारण करण्यास परवानगी दिलेल्या शिक्षकांना या निर्णयामुळे बाधा होत असेल तरी त्यांच्याकडून कोणतीही वसुली करण्यात येऊ नये.

ड) प्राथमिक आश्रमशाळेतील जे पदवीधर बी.एड. शिक्षक हे अप्रशिक्षित शिक्षक म्हणून सेवानिवृत्त झाले आहेत अशा शिक्षकांना नियुक्तीच्या दिनांकापासून प्रशिक्षित समजण्यात यावे व देय असल्यास त्यांना प्रशिक्षित शिक्षक म्हणून सेवानिवृत्तीचे लाभ देण्यात यावेत.

२. उपरोक्त अप्रशिक्षित शिक्षकांना प्रशिक्षित शिक्षक म्हणून समजण्याबाबत आदेश निर्गमित झाल्यानंतर यावरील वाढीव वित्तीय भाराचा खर्च हा मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर आदेश हे वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १३९/२०१८/सेवा-९, दि.०९.०७.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७२३१६२३३०९१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.07.23 16:25:09 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (ले.व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यय-१४/सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (का-१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती (का-११)